**प्रबंधक, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये शासकीय तंत्रनिकेतने, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक व प्रशासकीय सेवा, गट-ब पदावरील सरळ सेवेने नियुक्तीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र. एससीटी- ६५१३/(१५/१३)/तांशि-१,**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक :- २१/११/२०१६

**पहा :-** १) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे क्र.१५(२)(१७२)/१३१३०/सात-अ. दिनांक २७/११/२०१५ चे पत्र.
२) सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्र. एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र. १५६ कार्य- १२, दि.८/०५/२०१५
३) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. एससीटी- ६५१३/१५/१३/ तांशि-१, दिनांक :- २७ / ०७ /२०१६

**प्रस्तावना** :-

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भ क्र. ०१ येथील पत्रान्वये प्रबंधक, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक व प्रशासकीय सेवा, गट-ब या पदाच्या एकूण २६ उमेदवारांची शिफारस केली आहे. त्यापैकी संदर्भ क्र ०३ येथील शासन निर्णयान्वये ०८ उमेदवारांचे नियुक्तीचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. आयोगाने शिफारस केलेल्या उर्वरित उमेदवारांच्या नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत खालील उमेदवाराची प्रबंधक, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक व प्रशासकीय सेवा, गट-ब पदावर त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या रकान्यात ते ज्या दिनांकापासून त्यांच्या पदाचा कार्यभार स्वीकृत करतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिवीक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे.

| क्र | उमेदवाराचे नाव | आयोगाने दिलेला गुणवत्ता क्रमांक | वर्गवारी | पदस्थापनेचा तपशिल | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. राजेंद्र विठ्ठल मरकड | ०४ | इ.मा.व. | शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय, जिंतूर, जि.परभणी | निरंक |
| २ | श्रीमती ब्राह्मणे माया किसन | ०५ | अ.जा. | शासकिय तंत्रनिकेतन, जळगाव | चारित्र्य पडताळणीच्या अधीन राहून |
| ३ | श्री. बुदगे राजेश श्रीराम | ०६ | खुला | शासकिय तंत्रनिकेतन, नागपूर | चारित्र्य पडताळणीच्या अधीन राहून |

| क्र | उमेदवाराचे नाव | आयोगाने दिलेला गुणवत्ता क्रमांक | वर्गवारी | पदस्थापनेचा तपशिल | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| ४ | श्री. हटवार सुनिल प्रल्हाद | ०७ | इ.मा.व. | शासकिय निवासी महिला तंत्रनिकेतन, यवतमाळ | निरंक |
| ५ | श्रीमती भागवत शर्वरी राजाराम | १७ | खुला | शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर | निरंक |
| ६ | श्रीमती मेहजबीन मुबारक मुजावर | १८ | इ.मा.व. | शासकिय तंत्रनिकेतन, यवतमाळ | निरंक |
| ७ | श्री. गुंडू राजेश राजाराम | १९ | वि.मा.प्र. | शासकिय तंत्रनिकेतन, बीड | निरंक |
| ८ | श्रीमती कदम आशा विश्वासराव | २० | खुला | शासकिय तंत्रनिकेतन, साकोली | निरंक |
| ९ | श्रीमती देशमाने संपदा काशीनाथ | २१ | इ.मा.व. | शासकिय तंत्रनिकेतन, यवतमाळ | निरंक |
| १० | श्रीमती साळुंके शारदा भागवत | २४ | खुला | शासकिय तंत्रनिकेतन, अहमदनगर | सा.प्र.वि. च्या दि.२८.०४.२०१५ च्या अधिसूचनेतील नियम क्र.०७ (iv) नुसार |
| ११ | श्री. निकम संदिप कचरु | २५ | इ.मा.व. | शासकिय तंत्रनिकेतन, अमरावती | सा.प्र.वि. च्या दि.२८.०४.२०१५ च्या अधिसूचनेतील नियम क्र.०७ (ii) नुसार |
| १२ | श्रीमती विभुते आशा हनुमंत | २६ | खुला | शासकिय तंत्रनिकेतन, हिंगोली | निरंक |

०२. उपरोक्त उमेदवारांपैकी सर्व मागासवर्गीय उमेदवारांनी जात वैधता प्रमाणपत्र सादर केले आहे.

०३. उपरोक्त उमेदवारास संबंधित वैद्यकीय मंडळाने वैद्यकीय दृष्ट्या शासकीय सेवेसाठी पात्र ठरविले आहे. वरील उमेदवारांपैकी श्रीमती ब्राह्मणे व श्री.बुदगे वगळता इतर सर्व उमेदवारांचा चारित्र्य

पडताळणी अहवाल प्राप्त झालेला आहे. श्रीमती ब्राह्मणे  व श्री.बुदगे यांची नियुक्ती सामान्य प्रशासन विभागाच्या क चापअ-१००८/प्रक्र२१४/०८/ १६ अ दि. ०९.०९.२००९ मधील तरतूदीनुसार चारित्र्य पडताळणी अहवालाच्या अधीन  राहून करण्यात येत आहे. त्यानुसार सदर उमेदवारांनी नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून ०६ महिन्यांच्या आत चारित्र्य पडताळणी प्रमाणपत्र सादर न केल्यास त्यांची सदर पदावरील नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

०४. लोकसेवा आयोगाने उपरोक्त सर्व उमेदवारांची शिफारस  पूर्वीच्या सेवेतील गोपनीय अहवाल तपासणीच्या अधीन राहून केली आहे. तथापि, या उमेदवारांचे गोपनीय अहवाल  शासनास अद्याप अप्राप्त आहेत. उपरोक्त सर्व उमेदवारांची नियुक्ती पूर्वीच्या शासकीय सेवेतील गोपनीय अहवाल तपासण्याच्या अधीन  राहून करण्यात येत आहे.

०५. उपरोक्त उमेदवारांची, प्रबंधक, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक व प्रशासकीय सेवा, गट-ब या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून, नामनिर्देशनाने, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे :-

१) सदर उमेदवारांची वेतनश्रेणी रु. ९,३००-३४,८००/- या पे बँड व रु. ४,४००/- ग्रेड पे नुसार राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व  स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) सदर उमेदवारांस प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.

४) सदर उमेदवारांचे परिविक्षा कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची नसल्यास अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) सदर उमेदवारांची नियुक्ती सरळ सेवाप्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमाच्या अधीन राहून करण्यात येत आहे. ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून त्यांना सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१ /२००१/३९, दि.७/८/२००० अन्वये शासन सेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी /वापराबाबतचे  ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार शासन  निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/ २००१/३९, दि. १९/३/२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहीत मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येतील.

(७) सदर उमेदवारांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात यावे.

८) सदर उमेदवाराने त्यांच्या नावासमोर निर्देशिलेल्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत तात्काळ रुजु व्हावे. सदर विहीत मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्विकारली नाही तर आयोगाने घेतलेल्या परीक्षेत त्यांनी मिळविलेल्या गुणवत्ताक्रमानुसार त्यांना अनुज्ञेय असलेली ज्येष्ठता मिळणार नाही. शिवाय प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांनी वरील मुदतीत शासनास काहीही कळविले नाही तर, कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे सदरचे आदेश रद्द करण्यात येतील.

९) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि. १८/०८/२००९ मधील तरतुदीनुसार दि. १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचा-यांने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि. १ नोव्हेंबर,२००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि. १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२ जानेवारी, २००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधीत शासकीय कर्मचा-यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. दि. १८/०८/२००९ च्या परिपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचा-यास नवीन राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू ठरतील.

१०) सदर उमेदवारांचे सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

११) उमेदवारांस नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

१२) सदर उमेदवारांनी नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसुचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

०६. सदर नियुक्ती उमेदवाराने सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबून राहील. सदर प्रमाणपत्र नियुक्तीनंतर खोटे अथवा बनावट आढळल्यास सदर उमेदवाराची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

०७. हे आदेश प्राप्त होताच संबधित उमेदवारांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबधित संस्थाप्रमुखाकडे सादर करावा. तसेच संस्थाप्रमुखांनी संबंधित उमेदवारांचे पूर्वीच्या शासन सेवेतील गोपनीय अहवाल तपासून तद्नंतर उमेदवारांना रुजू करुन घ्यावे व उमेदवारांच्या गोपनीय अहवालाची एक प्रत व उमेदवाराचा रुजू अहवाल संचालकामार्फत शासनास सादर करावा.

०८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११२११४४७३१०९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shamkant B Parnaik

Digitally signed by Shamkant B Parnaik
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shamkant B Parnaik
Date: 2016.11.21 14:50:35 +05'30'

**(शा.भा.पारनाईक)**
कार्यासन आधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रती :-**

सर्व संबंधित उमेदवार (टपालाद्वारे)

**प्रत,**

१. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे).
५. सहसंचालक तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय , नाशिक /नागपूर / अमरावती / औरंगाबाद
६. संबंधित प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय/शासकीय तंत्रनिकेतने, (यांना कळविण्यात येते की, वरील उमेदवारास रुजू करुन घेताना त्यांच्या शैक्षणीक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी करावी व सदर उमेदवारांचे पूर्वीच्या शासकीय सेवेतील गोपनीय अहवाल तपासून ते पात्र असल्याची संस्थाप्रमुखांनी स्वत: खात्री करावी व उमेदवारास हजर करुन त्याबाबतचा रुजू अहवाल, उमेदवाराच्या गोपनीय अहवालाच्या प्रतीसह संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.)
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२ मुंबई/ नागपूर.
८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
९. निवड नस्ती (तांशि-१).